**रॅडक्लिफ फाऊंडेशन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई, जि.ठाणे संचलित रॅडक्लिफ स्कूल, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई, जि.ठाणे शाळेचे, प्लॉट नं.३, सेक्टर-८, खारघर, जि.रायगड येथे केलेल्या स्थलांतरास कार्योत्तर मान्यतेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राशास्थ ३२१७/प्र.क्र.१५०/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १२ जून, २०१८

वाचा : शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांकः माशास्थ २०१२/ (५९/१२)माशि-२, दिनांक ३१ जुलै, २०१३.

संदर्भ : विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई यांचे क्र.शिउसं/प्राथ-४/स्थलांतर/प्र.क्र.१३५/२०१६/ ११०३-०४, दिनांक २८ सप्टेंबर, २०१६ चे पत्र

**प्रस्तावना :**

रॅडक्लिफ फाऊंडेशन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई, जि.ठाणे संचलित रॅडक्लिफ स्कूल, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई, जि.ठाणे या इंग्रजी माध्यमाच्या कायम विनाअनुदानित प्राथमिक व उच्च प्राथमिक शाळेचे, प्लॉट नं.३, सेक्टर-८, खारघर, जि.रायगड येथे केलेल्या स्थलांतरास कार्योत्तर मान्यता प्रदान करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

सदर शाळेचे अपुऱ्या भौतिक सुविधा असलेल्या इमारतीतून सिडकोकडून लीझवर घेतलेल्या नवीन स्वयंपूर्ण इमारतीत केलेल्या स्थलांतरास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. :-

१) स्थलांतरीत शाळेची, किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

२) स्थलांतरापूर्वीच्या सर्व विद्यार्थ्यांचे जवळच्या शाळेत/ स्थलांतराच्या ठिकाणी समायोजन केले आहे व याबाबत कोणतीही तक्रार/ आक्षेप नाही. तसेच स्थलांतरीत ठिकाणची इमारत विद्यार्थ्यांसाठी सुरक्षित आहे याबाबत शिक्षणाधिकारी, नवी मुंबई महानगरपालिका शिक्षण विभाग, नवी मुंबई, जि.ठाणे यांनी खात्री करणे आवश्यक राहील.

३) स्थलांतरास सर्व शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी यांची सहमती असावी, तसेच सर्व पात्रताधारक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना स्थलांतरित ठिकाणी सामावून घेण्यात आले आहे व त्यांच्या सेवाशर्तीमध्ये बदल करण्यात येणार नाही याबाबत संस्थेचे अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टॅम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र घेण्यात यावे.

४) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ नुसार व शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशानुसार, शाळेसाठी पक्की इमारत व सर्व भौतिक सुविधा व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करून देण्यात येतील, याबाबत संस्थेचे अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टॅम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र घेण्यात यावे.

५) शाळेची यु-डायस मध्ये तसेच सरलची माहिती भरणे आवश्यक राहील.

६) स्थलांतरीत शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तींमध्ये बदल होणार नाही.

७) शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/ वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत शासनाकडून वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, शासन निर्णय, आदेश इ. चे पालन करणे संस्थेस बंधनकारक राहील.

८) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी मंजूरी देण्यात यावी.

९) सदर शाळा इंग्रजी माध्यमाची कायम विनाअनुदानित शाळा असल्याने शाळेतील शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे संपूर्ण दायित्व संस्थेवर राहील.

१०) सदरहू स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

११) भविष्यात शासन मान्यतेशिवाय शाळेचे स्थलांतरण करण्यात येणार नाही, याची संस्थेने दक्षता घेणे आवश्यक राहील.

२. वरील अट क्र.(२), (३) व (४) ची पूर्तता झाल्यावर, विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांनी सदरहू शाळेच्या स्थलांतरास मान्यता देण्याबाबत आवश्यक पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास कळविण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१२१५०४२०६४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2018.06.12 15:04:15 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, जवाहर बालभवन, चर्नी रोड - ४०० ००४.
३) शिक्षणाधिकारी, नवी मुंबई महानगरपालिका शिक्षण विभाग, नवी मुंबई, जि.ठाणे
४) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक), जिल्हा परिषद, रायगड
५) अध्यक्ष, रॅडक्लिफ फाऊंडेशन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई, जि.ठाणे
६) निवडनस्ती (एसएम-१).